नवनिर्मित पालघर जिल्ह्यासाठी
महाराष्ट्र मानव विकास कार्यक्रमातंर्गत
पदांची निर्मिती करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
नियोजन विभाग
शासन निर्णय क्रमांकः माविका -२०१४/प्र.क्र.६४/का.१४१८
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २७ ऑगस्ट, २०१४.

वाचा :

१) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र. माविमि-२०१०/प्र.क्र.८१/का.१४१८,दि.१९ जुलै, २०११.

२) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र. संकीर्ण-२०११/ प्र.क्र.१२१/का.१४१८, दि.११ नोव्हेंबर, २०११

३) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र. संकीर्ण-२०११/ प्र.क्र.१२१/का.१४१८,दि.२४ जानेवारी, २०१३

प्रस्तावना :

राज्यातील २२ जिल्ह्यांतील १२५ अतिमागास तालुक्यांचा मानव विकास निर्देशांक उंचावण्याकरीता संदर्भ क्र.(२) येथील दि. १९ जुलै, २०११च्या शासन निर्णयान्वये राज्यात मानव विकास कार्यक्रम राबविण्यास सुरूवात झाली. त्याचप्रमाणे, मानव विकास कार्यक्रमाची प्रभावी अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीने संदर्भ क्र.(३) येथील दि.११ नोव्हेंबर, २०११ च्या शासन निर्णयान्वये निवडलेल्या १२५ तालुके असलेल्या २२ जिल्ह्यांसाठी प्रत्येकी १ याप्रमाणे २२ सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, २२ संशोधन सहायक व २२ सांख्यिकी सहायक अशी पदे निर्माण करण्यात आली आहेत. याशिवाय, ज्या जिल्ह्यातील ४ व त्यापेक्षा अधिक तालुक्यांचा समावेश मानव विकास कार्यक्रमांतर्गत करण्यात आला आहे, अशा १५ जिल्ह्यांमध्ये जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास) हे पद निर्माण करण्यात आले आहे.

२. राज्य मंत्रिमंडळाने दि. १३ जून, २०१४ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार, ठाणे जिल्ह्याचे विभाजन करुन  १ ऑगस्ट, २०१४ पासुन पालघर हा नवीन जिल्हा अस्तित्वात आला आहे. त्या अनुषंगाने, मानव विकास कार्यक्रमासाठी नवीन पदांची निर्मिती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

३. ठाणे जिल्ह्याच्या विभाजनानंतर मानव विकास कार्यक्रमातील ८ तालुक्यांपैकी **६** तालुके (जव्हार, विक्रमगड, तलासरी, डहाणु, मोखाडा व वाडा) हे पालघर जिल्ह्यामध्ये समाविष्ट करण्यात आले असून उर्वरित **२** तालुके (मुरबाड व शहापुर) ठाणे जिल्ह्यात राहिले आहेत**.** ही बाब विचारात घेता**,** मानव विकास कार्यक्रमासाठी पालघर जिल्ह्यासाठी खालील पदांची निर्मिती करण्यात येत आहे**:-**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी (₹) | ग्रेड पे (₹) | पदांची संख्या |
|---|---|---|---|---|
| १. | जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास) | १५६००-३९१०० | ५४०० | १ |
| २. | सहाय्यक जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास) | ९३००-३४८०० | ४४०० | १ |
| ३. | संशोधन सहाय्यक | ९३००-३४८०० | ४३०० | १ |
| ४. | सांख्यिकी  सहाय्यक | ५२००-२०२०० | २८०० | १ |
| | एकुण | | | ४ |

४. तथापि, मानव विकास कार्यक्रमांतर्गत ठाणे जिल्ह्यातील २ तालुके राहणार असल्याने, उपरोक्त संदर्भ क्र. (२) येथील शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आलेले जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास) हे पद ठाणे जिल्ह्यातील तालुक्यांची संख्या कमी झाल्याने पालघर जिल्ह्यासाठी वर्ग करण्यात येत आहे व उर्वरित ३ पदे पालघर जिल्ह्यासाठी नव्याने निर्मित करण्यात येत आहेत.

५. मानव विकास कार्यक्रम हा तात्पुरता स्वरुपाचा कार्यक्रम असल्याने तसेच सदर कार्यक्रमातील तालुक्यांची निवड भविष्यात बदलण्याची शक्यता असल्याने सदरची पदे तात्पुरत्या स्वरूपाची असून ही पदे सदर कार्यक्रम चालू असे पर्यंत किंवा अधिकतम दि. २९ फेब्रुवारी, २०१६ पर्यंत सुरु ठेवण्यात येत आहेत.

६. सदर पदांच्या वेतनावरील खर्च संदर्भ क्र.(२) येथील शासन निर्णयात नमूद करण्यात आलेल्या लेखाशीर्षाखालील मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

७. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २९३/वि.सु.-१, दि.६ ऑगस्ट २०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक **२०१४०८२०१२१५३२०४१६** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arunkumar S Belgudri

Digitally signed by Arunkumar S Belgudri
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Arunkumar S Belgudri
Date: 2014.08.27 15:42:19 +05'30'

(अ.शि.बेळगुद्री)

शासनाचे उप सचिव

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव

२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव

३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव

४) मा. मंत्री / राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव

५) मा. कार्यकारी अध्यक्ष, राज्य नियोजन मंडळ, नवीन प्रशासकीय भवन, १८ मजला, मंत्रालयासमोर, मुंबई

६) शासनाचे मुख्य सचिव

७) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर

८) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग

९) विभागीय आयुक्त, (सर्व)

१०) सहसचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई

११) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन), यांचे खाजगी सचिव

१२) मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन), यांचे खाजगी सचिव

१३) उपसचिव (का. १४२६/१४२७), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

१४) जिल्हाधिकारी, (सर्व)

१५) मुख्य कार्यकारी अधिकारी, (सर्व)

१६) वित्त विभाग/सामान्य प्रशासन विभाग/महसूल व वन विभाग, मंत्रालय मुंबई

१७) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र शासन, मुंबई

१८) अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र शासन, मुंबई

१९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

२०) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

२१) उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)

२२) आयुक्त,मानव विकास आयुक्तालय,बाबा पेट्रोलपंपजवळ,अदालत रोड, औरंगाबाद

२३) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय

२४) सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय (सर्व)

२५) जिल्हा नियोजन अधिकारी (सर्व)

२६) निवड नस्ती (का.१४१८), नियोजन विभाग

---------------